

PRATHAM BOOKS

A Book in Every Child's Hand

वाचन पातळी १

# राणीचा शाळेतलापहिला दिवस!

**Author:** Cheryl Rao
**Illustrator:** Mayur Mistry
**Translator:** Varsha Gajendragadkar



आज माझ्या शाळेचा पहिला दिवस! आई माझा हात धरून मला घेऊन चालली आहे.
“आई गं, आता मी मोठी झालेय हं.” मी म्हणते.
“सोड माझा हात, मला एकटीला चालू दे!” आई माझा हात आणखी घट्ट पकडते.



शाळेपाशी मुलांची खूपच गर्दी आहे. कुणी बसनं येतंय, कुणी कारमधून.
काही जण रिक्षानं तर काही सायकलवरून. माझ्यासारखी चालत येणारी मुलंपण आहेत.



आम्ही आता शाळेच्या दाराशी पोचलोय.
आई माझा हात सोडते. आतमध्ये मला एकटीलाच जायचंय.
माझ्या भोवती कितीतरी नवे चेहरे दिसतायत.



मी एक पाऊल पुढे टाकते. मग दुसरं. मागे वळून बघते, तर आई लहान लहान होत चाललीय. ती दिसेनाशीच होईल का? मी धावत आईकडे जाते.
आता मला मी इतकी मोठी झालेय असं नाही वाटत. मी तिचा हात पकडते.
आणि म्हणते, "तू मला सोडून जाऊ नको."



आता सगळी मुलं आत गेलीत. बाहेर मी एकटीचआहे. बाई बाहेर येतात आणि माझ्याकडे बघून हसतात. मीपण हसते.

आई म्हणते, “तू शाळा सुटल्यावर बाहेर येशील नं, तेव्हा मी इथेच असेन, बरं का.”

मी तिचा हात सोडते. ती माझ्याकडे बघत हात हलवते.



मी धावत आत जाते.
शाळा सुटली की आई परत इथेच भेटणार!

## Story Attribution:

This story: राणीचा शाळेतलापहिला दिवस! is translated by Varsha Gajendragadkar . The © for this translation lies with Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Based on Original story: 'Rani's First Day at School', by Cheryl Rao . © Pratham Books , 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

## Other Credits:

This book has been published on StoryWeaver by Pratham Books.The development of the print version of this book has been supported by HDFC Asset Management Company Limited (A joint venture with Standard Life Investments). www.prathambooks.org

## Illustration Attributions:

Cover page: Girl going to school, by Mayur Mistry © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 2: Girl holding mother's hand at school, by Mayur Mistry © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 3: Children and vehicles outside building by Mayur Mistry © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 4: Girl looking scared, by Mayur Mistry © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 5: Girl hugging mother, by Mayur Mistry © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 6: Girl and two women, by Mayur Mistry © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 7: Happy girl going to school , by Mayur Mistry © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

# राणीचा शाळेतलापहिला दिवस!

(Marathi)

शाळेच्या पहिल्या दिवशी राणीला कोण कोण दिसतं? तिला काय वाटतं?

या पुस्तकाची वाचन पातळी १ आहे. वाचनाची सुरुवात करायला उत्सुक असणाऱ्या छोट्यांसाठी.

